**मंत्रालयात अधिकारी / कर्मचारी वर्गा [illegible] उपस्थिती नोंदणी कार्डस सिस्टिम लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.आयएनडी-१०.०१/प्र.क्र.७/२००१/१८ (र.व का.)**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १६ ऑगस्ट,२००२**

**वाचा :**

**१.शासन निर्णय क्र.आयएनडी-१०.०१/प्र.क्र.७/२००१/१८(र.व का.),दि.९.४.२००२.**
**२.शासन परिपत्रक क्र.सीओएम-२००१/प्र.क्र.२९४/सा.प्र.वि.-सातंक ३९,दि.२९.६.२००१.**

**प्रस्तावना :-**

मंत्रालयातील अधिकारी व कर्मचारी वर्गाला कार्यालयीन उपस्थिती नोंदणी करिता उपस्थिती नोंदणी कार्डस प्रणाली (Time Attendance System) दि.२.७.२००२ रोजी पासून प्रायोगिक तत्वावर सुरु करण्यात आली होती. सदर प्रणाली पूर्णपणे कार्यरत झाली असून सर्व विभागातील अधिकारी / कर्मचारी वर्ग या प्रणालीचा उपयोग करीत आहे. उपस्थिती नोंदणी प्रणाली अनिवार्य करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

मंत्रालयात प्रायोगिक तत्वावर कार्यान्वित असलेली कर्मचारी व अधिकारी वर्ग यांची उपस्थिती नोंदणी कार्डस प्रणाली (Time Attendance System) अनिवार्य करण्याचा निर्णय शासनाने आता घेतला आहे. सदर उपस्थिती नोंदणी कार्डस प्रणाली ही मंत्रालय तसेच नवीन प्रशासकीय भवनातील सर्व अधिकारी / कर्मचा-यांनां लागू रहाणार आहे. माहिती तंत्रज्ञान संचालनालय ही उपस्थिती नोंदणी कार्डस प्रणालीकरिता मध्यवर्ती यंत्रणा आहे.

**कार्यपध्दती :-**

१. अधिकारी / कर्मचारी वर्गाला उपस्थिती नोंदणी कार्डसचे वाटप करण्यात आले आहे. आता सर्व अधिकारी / कर्मचा-यांनी अनिवार्यपणे कार्डाचा वापर उपस्थिती नोंदणीसाठी सुरु करावा.

२. मंत्रालयात / नवीन प्रशासकीय भवनातील प्रवेशद्वाराजवळ दर्शनी ठिकाणी कार्ड रिडर लावलेले आहेत. सदर रिडरवर **PLEASE SHOW CARD HERE** असे लिहिलेल्या चौकानातील मजकूरावर छायाचित्र असलेला कार्डचा भाग **एकदाच** लावावा. त्यानंतर स्क्रीनवर **ACCESS ALLOWED** व कार्ड क्रमांक दिसल्यावर प्रवेशाची नोंद घेतल्याचे निश्चित समजावे.

३. **उपरोक्त सूचित केल्याप्रमाणे कार्यालयात प्रवेश करताना तसेच दिवसअखेरीस कार्यालय सोडताना सर्वांनी नोंदणी कार्डचा वापर करणे अनिवार्य आहे.**

४. विभागाच्या उपस्थितीची माहिती बघण्याकरिता तसेच मासिक अहवालाचा प्रिंटआऊट घेण्याबाबतच्या सविस्तर सूचना उपरोक्त अनुक्रमांक २ मधील परिपत्रकात देण्यात आलेल्या आहेत.

या परिपत्रकातील आदेश तात्काळ अंमलात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राजेंद्र सिंह)
**प्रधान सचिव (प्र.सु.व र.व का.),सा.प्र.वि.**

प्रति,

१. मा.राज्यपालांचे सचिव (५ प्रती),
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,
५. शासनाचे मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
६. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
७. उप सचिव (आस्थापना),सर्व मंत्रालयीन विभाग,
८. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई.
९. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१०. संचालक,माहिती तंत्रज्ञान संचालनालय,मुंबई.
११. निवड नस्ती / १८ (र. व का.)